राज्य सरोवर संवर्धन योजना

**कागल जि. कोल्हापूर येथील श्रीमंत जयसिंगराव तलावाचे पर्यावरणीयदृष्टया संवर्धन व संरक्षण व सौंदर्यीकरण कामाच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत तसेच अनुदान वितरीत करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**

**पर्यावरण विभाग**

**शासन शुद्धीपत्रक: क्र.रासयो-२००७/प्र.क्र.६०/तां.क.३**

नवीन प्रशासकीय भवन, १५ वा मजला,

मादाम कामा मार्ग, हूतात्मा राजगुरू चौक,

मुंबई-४०० ०३२.

दिनांक: १८ मार्च, २०१५

वाचा : **शासन निर्णय, पर्यावरण विभाग,समक्रमांक, दि. २४ फेब्रुवारी, २००९.**

**शुद्धीपत्रक :**

उपरोक्त संदर्भाधिन दि. २४ फेब्रुवारी, २००९ च्या शासननिर्णयातील परिच्छेद क्र.१ खालील प्रमाणे वाचण्यात यावा.

“राज्य योजनांतर्गत योजनेतील राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत कागल शहरातील श्रीमंत जयसिंगराव तलावाचे पर्यावरणीयदृष्ट्या संवर्धन करण्यासाठी यापूर्वी मंजूर एकूण रु. २६०.४६ लाखापैकी अनुज्ञेय राज्य हिश्श्याचे ७० टक्के म्हणजेच रूपये १८२.३२ लाख ऐवजी ९० टक्के म्हणजेच रूपये २३४.४१ लाख (अक्षरी रूपये दोन कोटी चौतीस लाख एक्केचाळीस हजार फक्त) सुधारित तरतूद या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात येत आहे. तसेच उर्वरीत १० टक्के नगर परिषदेचा हिस्सा म्हणजेच रूपये २६.०५ लाख (रूपये सव्वीस लाख पाच हजार फक्त) कागल नगर परिषद उपलब्ध करून देईल.”

२. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१५०४०६११२७३२१७०४ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Laxmikant Lakhote

Digitally signed by Ravindra Laxmikant Lakhote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=421202, st=Maharashtra, cn=Ravindra Laxmikant Lakhote
Date: 2015.04.06 11:38:12 +05'30'

(र. ल. लखोटे)

कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. प्रधान सचिव, पर्यावरण, मंत्रालय, मुंबई,

२. जिल्हाधिकारी, कोल्हापूर,

३. संचालक, नगरपालिका प्रशासन, मुंबई,

४. मा. मंत्री(पर्यावरण) यांचे खाजगी सचिव

५. मा. मंत्री(पर्यावरण) यांचे खाजगी सचिव

६. मुख्याधिकारी, नगरपरिषद, कागल, जि. कोल्हापूर,

७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा व हक्कदारी/लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,

८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई,

९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,

१०.वित्त विभाग,व्यय-१६/अर्थसंकल्प-५, मंत्रालय, मुंबई,

११.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,

१२.निवडनस्ती, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.